शिक्षणखात्याचा मंजुरी-क्रमांक : पापुमं/१०८९/बाभाम/१२११८/(१)स / दिनांक १०-५-१९८९

इयत्ता पहिली

## मराठी

# बालभारती



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

प्रथमावृत्ती : १९८९
द्वितीय सुधारित आवृत्ती : १९९४
पुनर्मुद्रण : १९९६



मराठी भाषा समिती :

डॉ. मधुकर आष्टीकर, अध्यक्ष
डॉ. भाऊ मांडवकर, सदस्य
श्री. दया पवार, सदस्य
श्री. व्यंकटेश चौधरी, सदस्य
श्री. नरहर मंद्रुपकर, सदस्य
सौ. प्रतिभा जंगले, सदस्य
श्री. स्वामीनाथ सिंह, विद्यासचिव भाषा व संकीर्ण
सौ. ज्ञानदा नाईक प्र. मराठी विशेषाधिकारी

चित्रकार : डॉ. भैय्यासाहेब ओंकार, पुणे

मुखपृष्ठ : श्री. नरेंद्र विचारे, मुंबई.

फोटोसेटिंग : मे. डेप्थ फोटोटाईपसेटर्स, मुंबई-४०० ०२०.

कागद : ६१ × ८६ सेमी/६० ग्रॅम क्रीम व्होव

निर्मिती : श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी
श्री. सुनील साखोळकर, निर्मिती अधिकारी

मुद्रक : न्यू राधारमण प्रिं. प्रेस, मुंबई- 31.

मुद्रणादेश क्र. : N/PTG./T.B./1151 (1·0)

प्रकाशक : श्री. पी. वाय. साळवी, नियंत्रक
पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, मुंबई ४०० ०१८.

# प्रस्तावना

'राष्ट्रीय शैक्षणिक धोरण १९८६'नुसार महाराष्ट्र राज्यात 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम १९८८' तयार करण्यात आला.

या शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित मराठी विषयाची इयत्ता १ ते ८वीची नवीन बालभारती माला १९८९-९० या शालेय वर्षापासून पाठ्यपुस्तक मंडळ क्रमशः प्रकाशित करत आहे. या मालेतील हे पहिले पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

विद्यार्थिकेंद्रित स्वयंअध्ययन-पद्धती हे नव्या शैक्षणिक धोरणातील एक प्रमुख तत्त्व आहे. ही स्वयंअध्ययन-पद्धती यशस्वी होण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरेल, अशी नवी विचारसरणी बालभारतीच्या या पाठ्यपुस्तकाची रचना करताना अवलंबलेली आहे. त्यासाठी पाठ्यपुस्तकातच प्रत्येक पाठावर आधारित अशा स्वाध्याय-पत्रिका दिलेल्या आहेत.

भाषा शिकणे म्हणजे त्या भाषेत बोललेले नीट समजणे व आपल्या मनातले नीट सांगता येणे. त्यासाठी संभाषण, वाचन व लेखन आवश्यक ठरते. अक्षर, शब्द, वाक्ये आणि प्रसंग या सर्वांतूनच भाषा शिकण्याचा उद्देश साधला जाईल याकरिता येथे संमिश्र पद्धती उपयोगात आणली आहे. वर्णांचे लेखन सुलभ व्हावे म्हणून एकातून दुसरे अक्षर सहजगत्या निघेल असा वेगळा वर्णक्रम येथे स्वीकारला आहे.

हे पाठ्यपुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व दर्जेदार व्हावे या दृष्टीने महाराष्ट्राच्या सर्व भागांतील निवडक शिक्षक, तसेच काही शिक्षणतज्ज्ञ व विषयतज्ज्ञ यांच्याकडून या पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले. आलेल्या सूचना व अभिप्राय यांचा मराठी समितीने योग्य तो विचार करून या पुस्तकाला अंतिम स्वरूप दिले आहे. त्यांनी दिलेल्या सहकार्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

मंडळाची मराठी विषय समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमांतून हे पुस्तक तयार झाले आहे. पाठ्यपुस्तकलेखनामध्ये मराठी विषय समितीला ज्या ज्या तज्ज्ञांची मदत झाली, त्या सर्वांचे मंडळ मनःपूर्वक आभारी आहे.

अध्ययन व अध्यापन प्रभावी व्हावे यासाठी या पुस्तकाची अध्यापनपुस्तिका मंडळाने प्रकाशित केली आहे. शिक्षक व इच्छुक पालक यांना ही अध्यापनपुस्तिका उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो.

विद्यार्थी, पालक व शिक्षक या पुस्तकाचे स्वागत करतील अशी आशा आहे.

पुणे,
दि. ६ एप्रिल, १९८९
गुढीपाडवा,
सौर चैत्र १६, शके १९११

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ.

---

'मराठी बालभारती इयत्ता पहिली' या पुस्तकाच्या मोठ्या आकाराच्या संदर्भात वेळोवेळी मिळालेल्या निरनिराळ्या सूचनांवरून प्राप्त परिस्थितीमध्ये ही छोट्या आकारातली सुधारलेली आवृत्ती तयार करण्यात आली आहे.

पुणे,
बलिप्रतिपदा,
दि. ७.११.१९९१
सौर कार्तिक १६, शके १९१३

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

## निवेदन

शासन निर्णय क्रमांक टीबीके-१८९२(४०९/९२) माशि-७, दिनांक ११ ऑक्टोबर, १९९३ अन्वये इयत्ता पहिलीच्या या पाठ्यपुस्तकात किमान अध्ययन क्षमतांवर आधारित 'चाचण्या' अंतर्भूत करून सदर द्वितीय सुधारित आवृत्ती प्रकाशित होत आहे. निर्धारित संपूर्ण अभ्यासक्रम सर्व विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचवताना प्रत्येक विद्यार्थ्यामध्ये अपेक्षित अध्ययन क्षमता विकसित झाल्या आहेत अथवा नाहीत हे शिक्षकांनी लक्षात घ्यायला हवे. अपेक्षित संपादणुकीचे प्रत्याभरण घेताना जाणीवपूर्वक किमान अध्ययन क्षमतांच्या संपादणुकीकडे विशेष लक्ष पुरवणे अपेक्षित आहे. असे प्रत्याभरण घेणे शिक्षकांना सोपे जावे या दृष्टिकोनातून या पाठ्यपुस्तकात 'किमान अध्ययन क्षमता चाचण्यांचा' अंतर्भाव करण्यात आला आहे. सदर चाचण्यांच्या आधारे शिक्षकांनी वेळोवेळी प्रत्याभरण घेत राहावे. त्याचबरोबर संपूर्ण अभ्यासक्रम सर्व विद्यार्थ्यांप्रत पोहोचवण्याचा डोळस प्रयत्न करावा, अशी अपेक्षा आहे.

सि आ देवकर

संचालक,<br>महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती<br>व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

पुणे,<br>दिनांक : १ जानेवारी, १९९४<br>११ पौष, शके १९१५

# अनुक्रमणिका

# अक्षरांचे अवयव

वरील रेषा व अर्धवर्तुळे वारंवार पाटीवर काढून घ्यावीत. या अवयवांच्या साहाय्याने १ ते ९ अंकही सहजतेने काढता येतील.

## १. | व | ब | क |



वड व



बदक ब



कमळ क

ब क व

पूर्वगामी 'C' अर्धवर्तुळाला रेषा जोडत जोडत एकातून एक अक्षरे निघतात, ते समजावून द्यावे.

## स्वाध्याय

शिक्षकांनी सूचना किंवा प्रश्न वाचून दाखवावे. मुलांना मार्गदर्शन करावे. अक्षरावर शिरोरेषा देण्यास सांगावे. पाटीवर सराव करून घ्यावा. ही सूचना सर्व पाठांसाठी आहे.

१. दिलेल्या अर्धवर्तुळाच्या दोन्ही टोकांना सरळ रेघ जोडा.

व C C C C C

२. खालील शब्दांतील 'व' या अक्षराखाली रेघ ओढा.

वरण कवठ जमव जवस

३. 'व' काढा —

व

४. 'व' काढा व त्यापासून 'ब' बनवा. जसे — ब

ब

५. 'ब'भोवती वर्तुळ काढा. जसे — (ब)दक

ब न ब ळ ब ब न ब ट ण

६. 'व'पासून 'क' काढा. जसे — क

क

७. 'क'वर तिरपी रेघ ओढा. जसे — कढई

कवठ सडक कमल कळस

२. | च | घ | ध |
|---|---|---|



चरक च



घर घ



धरण ध

घ च ध

बघ

चव बघ.

## स्वाध्याय

१. दिलेल्या अर्धवर्तुळापासून 'च' बनवा. जसे — च

C C C C C C

२. दिलेल्या दोन अर्धवर्तुळांपासून 'घ' बनवा. जसे — घ

ɛ ɛ ɛ ɛ ɛ ɛ

३. 'घ' काढा व त्यापासून 'ध' बनवा. जसे — ध

ध

४. दिलेल्या शब्दांतील 'च' खाली रेघ ओढा.

जसे — चरक चटई वचक चमक लचक

५. दिलेल्या शब्दांतील 'घ' भोवती वर्तुळ '◯' करा.

जसे — पड(घ)म घण बघ घड घडव

६. दिलेल्या शब्दांतील 'ध' वर तिरपी रेघ ओढा.

जसे — धर मध धन सधन धपकन

७. वाचा व लिहा —

कच वचक बचक चकव

८. खालील मोकळ्या जागी तीन चेंडू काढा.

३. | ट | ढ | द | क्ष |
|---|---|---|---|



टरबूज 



ढग 



दरवाजा 






| क्ष | द | ट | ढ | दव | चढ |
|---|---|---|---|---|---|

घट बघ. बदक बघ.

## स्वाध्याय

१. अर्धवर्तुळ काढून 'ट' बनवा. जसे — ट

ट

२. 'ट'पासून 'ढ' बनवा. जसे — ढ

ढ

३. 'ट'पासून 'द' बनवा. जसे — द

द

४. 'क्ष' बनवा. जसे — क्ष

क्ष

५. खालील शब्दांतील 'ट' खाली रेघ ओढा —

तट      कट      कटक      चटक

६. खालील शब्दांतील 'ढ' या अक्षरावर तिरपी रेघ ओढा —

ढग      अढळ      चढण      ढमढम

७. खालील शब्दांतील 'द' या अक्षराखाली रेघ ओढा —

दगड      गडद      दरड      पदक

८. 'क्ष' या अक्षराभोवती वर्तुळ करा —

द क्ष      प क्ष      क्ष ण      भ क्ष क

४. | ठ | ळ | ड | ङ |
|---|---|---|---|





ठसा 

बाळ 



डफ 





ळ ड ङ ठ

बळ  वड  कवठ

चटचट वळ. कवठ बघ.

## स्वाध्याय

१. 'ट' काढा. त्यापासून 'ठ' बनवा. जसे —

ठ

२. 'ठ' काढा. त्यापासून 'ळ' बनवा. जसे —

ळ

३. 'ट' काढा. त्याच्याखाली अर्धवर्तुळ जोडा व 'ड' बनवा. जसे —

ड

४. 'ड' काढा. त्यापासून 'ङ' बनवा. जसे —

ङ

५. 'ठ' या अक्षराभोवती वर्तुळ करा —

म ठ    आ ठ    ठ ळ क    ठ क ठ क

६. 'ळ' या अक्षरावर तिरपी रेघ ओढा —

पळ    पळस    अढळ    चळवळ

७. गाळलेल्या जागी 'व', 'च', 'घ' यांपैकी योग्य अक्षर लिहा. शब्द बनवा. वाचा —

....ळवळ  च....ळ  घड....ड  ....टवट  चट....ट

## ५. | इ | ई | झ | ह |





इमारत इ

आई ई





हरीण

झडप झ

ह

| ई | झ | इ | ह |
|---|---|---|---|

| झड | ईद | कढई |
|---|---|---|

चटई झटक. हळद दळ.

## स्वाध्याय

१. 'ड' काढा. त्याच्यापासून 'इ' बनवा.
जसे — इ

इ

२. 'इ' काढा. त्याच्यापासून 'ई' बनवा. जसे — ई

ई

३. 'इ' पासून 'झ' बनवा. जसे — झ

झ

४. 'ड' काढा. खालच्या बाजूला 'C' असे अर्धवर्तुळ जोडा व 'ह' बनवा. जसे — ह

ह

५. दिलेल्या शब्दांतील 'झ', 'ई', 'ह' खाली रेघ ओढा —

झगमग कढई हळद

६. वाचा व लिहा —

चटई झटक हळद दळ

# ६. ग म भ



गवत



मगर



भजन

म ग भ

| मध | गवई | भडक | दगड |
|---|---|---|---|

**गड बघ. गड चढ.**

पश्चिमगामी ')' अर्धवर्तुळाला रेषा जोडत जोडत एकातून एक अक्षरे निघतात, ते समजावून द्यावे.

## स्वाध्याय

१. दिलेल्या अर्धवर्तुळापासून 'ग' बनवा. जसे — ) ग

ग

२. 'ग' पासून 'म' बनवा. जसे — म

म

३. 'म' पासून 'भ' बनवा. जसे — भ

भ

४. खालील शब्दांतील 'ग' खाली रेघ काढा —

खग      गळ      मग      दगड

५. दिलेल्या शब्दांतील 'म' अक्षराभोवती वर्तुळ करा —

म ळ      ग र म      म ग र      म ट म ट

६. 'भ' वर तिरपी रेघ मारा —

नभ      भटक      अभय      भळभळ

७. वाचा व लिहा —

मग      गमक      घडव      भडक

७. | अ | ॠ | र | स | ख |
|---|---|---|---|---|

अ अ ॠ ॠ

रवी र



ससा स





खटारा ख

| स | र | अ | ख | ॠ |
|---|---|---|---|---|

खळखळ खडखड

सई, बस. वर बघ.

## स्वाध्याय

१. अर्धवर्तुळापासून 'ञ' बनवा. जसे —

अ

२. 'ञ' पासून 'ऋ' बनवा. जसे — ञ

ऋ

३. दिलेल्या अर्धवर्तुळापासून 'र' बनवा. जसे —

र

४. 'र' काढा. त्यापासून 'स' बनवा. जसे —

स

५. 'र' काढा. त्याच्यापुढे 'व' काढा आणि ते '...' असे जोडून 'ख' बनवा. जसे — ख

ख

६. गाळलेल्या जागी 'स' भरा —

र...... ......रस ......बळ ......मक्ष

७. शब्दांतील 'ख' या अक्षराखाली रेघ ओढा —

खडक बखळ ओळख खरवस

८. 'र' या अक्षराभोवती गोल करा —

र क्ष क र ब र ह र क ग र ग र



८. | य | थ | ज | ज्ञ |
|---|---|---|---|

गाय य



थवा थ



जहाज ज

ज्ञ ज्ञ

| ज्ञ | थ | ज | य |
|---|---|---|---|

थरथर  थडथड

समर, खडक बघ.
जय, सरसर चढ.

## स्वाध्याय

१. अर्धवर्तुळापासून 'य' बनवा. जसे — ) य

य

२. 'य' पासून 'थ' बनवा. जसे — य थ

थ

३. अर्धवर्तुळापासून 'ज' बनवा. जसे — ) ज

ज

४. 'ज' पासून 'ज्ञ' बनवा. जसे — ज ज्ञ

ज्ञ

५. खालील अक्षरे योग्य क्रमाने योजून अर्थपूर्ण शब्द बनवा.
जसे — नवज — वजन

कडख ढच डकक मईस

६. 'य' या अक्षराची नक्षी काढा. जसे — ययययययय

९. | उ | ऊ | श |



उखळ

उ



ऊस

ऊ



शहर

श

ऊ श उ

मऊ उजळ शहर

उदय, ऊठ.

बदक धर. शरद, बस.

## स्वाध्याय

१. अर्धवर्तुळापासून 'उ' बनवा. जसे — उ

उ

२. 'उ' पासून 'ऊ' बनवा. जसे — उ ऊ

ऊ

३. अर्धवर्तुळापासून 'श' बनवा. जसे ) श

श

४. गाळलेल्या जागी 'उ' लिहा. शब्द वाचा. लिहा —

...गम ...सळ ...दय ...थळ

५. वाचा आणि लिहा —

यश दशक उखळ रस

उदय ऊठ.

बदक धर.

शरद बस.

## चाचणी १

(१) (पूर्वगामी) C अशा अर्धवर्तुळापासून तयार होणारी कोणतीही पाच अक्षरे लिहा व ती त्या वर्तुळापासून कशी तयार झाली ते क्रमाक्रमाने काढून दाखवा.

(२) खालील शब्दांतून ध, ढ, ड, इ, स, ळ, ह ही अक्षरे ओळखा व त्याखाली रेघ ओढा.

धडक, सळई, ढब, इसब, हळ, हस.

(३) खाली दिलेल्या अक्षरांपैकी योग्य अक्षर रिकाम्या जागी लिहा.

क्ष, झ, द, व, च, ब, घ, क.

अ. . . द,. . . ळ,. . . वड, घड. . . . . . ढव,. . . दक, घट. . .

(४) खाली दिलेल्या अक्षरसमूहातील अक्षरे निवडून तीन अर्थपूर्ण शब्द तयार करा.

ट, व, ई, ठ, क, च, ब, द.

(५) खालील शब्द वाचा.

कक्ष, बळकट, चघळ, धडपड, झटक, हळहळ, ढवळ, ईद.

(६) (पश्चिमगामी) ) अशा अर्धवर्तुळापासून तयार होणारी कोणतीही पाच अक्षरे लिहा व ती त्या वर्तुळापासून कशी तयार झाली ते क्रमाक्रमाने काढून दाखवा.

(७) खालील अक्षरसमूहातून ज, ज्ञ, स, ख, भ, थ, श ही अक्षरे ओळखा व त्यांच्याखाली रेघ ओढा.

यज्ञ, भगर, यश, गरज, मखर, रथ, सरस.

(८) दिलेल्या अक्षरांपैकी योग्य अक्षर रिकाम्या जागी भरा.
ग, म, र, य, उ, ऊ.

. . . जर, च . . . क, . . . ब . . ., भ . . .,
. . . गम, म . . .

(९) खाली दिलेल्या अक्षरसमूहातील अक्षरे निवडून तीन अर्थपूर्ण शब्द तयार करा.

ळ, म, र, स, ग, ख, ड.

(१०) खालील शब्द वाचा.

यज्ञ, थरथर, जखम, सरगम, शर, ऊद, उखळ.

(११) 'ससा' हे गाणे सामूहिकरित्या व उचित हावभाव करून म्हणा.

(१२) खालील चित्रे ओळखा व त्यापुढे त्यांची नावे लिहा.

१)  ------------------

२)  ------------------

३)  ------------------

(१३) पाठ्यपुस्तकातील चित्रवाचन क्र. १ यातील चित्रे पाहून गोष्ट सांगा.

## १०. अ आ



अजगर



अ

आगगाडी आ



चाक चा

आ चा अ

| मामा | शाळा | काका | आज्ञा |
|---|---|---|---|
| चार | सहा | आठ | दहा |

आशा, ऊठ.

उमा, आवळा खा. अजय, गा.

'आ' असा उच्चार दर्शवण्यासाठी काना 'ा' हे स्वरचिन्ह अक्षराला जोडून वापरण्यास सांगावे.

## स्वाध्याय

१. अर्धवर्तुळापासून 'अ' बनवा. जसे — अ

अ

२. 'अ' काढा. त्यापासून 'आ' बनवा. जसे — आ

आ

३. खालील शब्दांच्या सुरवातीला 'अ' लिहा. शब्द वाचा आणि लिहा — ......ढळ ......क्षय ......क्षर

४. खालील शब्दांच्या सुरवातीला 'आ' लिहा. शब्द वाचा आणि लिहा — ......ई ......ग ......ज ......वर

५. खालील शब्दांतील दुसऱ्या अक्षराला 'काना' द्या. शब्द वाचा आणि लिहा. जसे — वार वार

मळ भर काळ गाळ

६. वाचा आणि लिहा —

उमा, आवळा खा.

## ११. ओ औ अं अः



ओठ ओ



औषध औ



अंगठा अं

अः अः

अं ओ औ अः

ओहळ अंगाई औजार अंक

सरसर धारा. खळखळ ओढा.
भरभर वारा. थडथड गारा.

## स्वाध्याय

१. गाळलेल्या जागी 'ओ' हे अक्षर लिहा —

ओढ ........ठ ........ळ ........ळख

तयार झालेले शब्द वाचा. लिहा —

..............................................................................

..............................................................................

२. गाळलेल्या जागी 'औ' हे अक्षर लिहा —

औत ........षध ........क्षण ........दुंबर

तयार झालेले शब्द वाचा व लिहा —

..............................................................................

..............................................................................

३. गाळलेल्या जागी 'अं' हे अक्षर लिहा —

अंश ........ग ........क ........गण

तयार झालेले शब्द वाचा व लिहा —

..............................................................................

..............................................................................

४. वाचा आणि लिहा —

ओळ अंध ओळख अंगठा

..............................................................................

..............................................................................

१२. | त | न | ल |



तराजू त



नळ न



लसूण ल

न त ल

नावा साात नऊ लाल

नाताळ तलाव नारळ

ढग गडगडला.
अंधार झाला. ढग बरसला.
ओहळ भरला. तलाव भरला.

दक्षिणगामी '⌒' अर्धवर्तुळाला रेषा जोडत एकातून एक अक्षरे निघतात, ते समजावून द्यावे.

## स्वाध्याय

१. दिलेल्या अर्धवर्तुळापासून 'त' बनवा. जसे —

त

२. 'त' काढा. त्याचा 'न' बनवा. जसे —

न

३. 'त' काढा. त्याचा 'ल' बनवा. जसे —

ल

४. 'त', 'ता' ही अक्षरे खालील शब्दांत योग्य ठिकाणी भरा. शब्द पुन्हा लिहा —

......लवार ......क ......ट ......र ......स

५. 'न', 'ना' ही अक्षरे खालील शब्दांत योग्य जागी भरा. शब्द वाचा आणि लिहा —

......मन ......रळ ......ळ ......ट ......क

## १३. | ण | प | ष | फ |



बाण



परकर

षट्कोन



फणस



ष ण फ प

पाच फळा वाटाणा भाषण

हसन, फणस आण.

शरद, फणस काप.

मगन, गरा काढ. उषा, गरा खा.

रसाळ गरा खायला बरा.

उत्तरगामी '◡' अर्धवर्तुळाला रेषा जोडत जोडत एकातून एक अक्षरे निघतात, ते समजावून द्यावे.

## स्वाध्याय

१. अर्धवर्तुळ आणि उभी रेघ यांपासून 'ण' हे अक्षर बनवा.
जसे — ण

ण

२. अर्धवर्तुळापासून 'प' बनवा. जसे — प

प

३. 'प' पासून 'ष' बनवा. जसे — ष

ष

४. 'प' पासून 'फ' बनवा. जसे — फ

फ

५. खालील शब्दांत रिकाम्या जागी प, ष, फ, ण यांपैकी एक योग्य अक्षर लिहा —

भू ... ण ...... णस रामाय ...... ...... डवळ

६. वाचा आणि लिहा —

रसाळ गरा ......

खायला बरा. ......

# १४. शिटी वाजली



दिवा ि

शिटी ी



शिटी वाजली.
बालवीर आला.
वीरबाला आली.
हरी आला.
मारिया आली.
कवायत झाली.
सफाई झाली.



| विळा | खिळा |
|---|---|

| दिवाळी | बहीण | वहिनी |
|---|---|---|

'इ' आणि 'ई' असे उच्चार दर्शवण्यासाठी ऱ्हस्व वेलांटी 'ि' व दीर्घ वेलांटी 'ी' ही स्वरचिन्हे अक्षरांना जोडून वापरण्यास सांगावे व उच्चारांतील फरक सांगावा.

## स्वाध्याय

१. शब्दातील पहिल्या अक्षराला ऱ्हस्व वेलांटी द्या. वाचा आणि लिहा. जसे — वि<u>ळा</u>

वडा चरा कडा चवडा

२. खालील शब्दांतील ऱ्हस्व वेलांटी असलेल्या अक्षराखाली रेघ ओढा —

विळी चिमणी हिरवी अनिल

३. पुढील अक्षरे योग्य ठिकाणी लिहा. वाचा —

वि मि हि शि

....रा ....वाळा ....रची र....वार

तयार झालेले शब्द वाचा व लिहा —

४. खालील शब्दांतील शेवटच्या अक्षराला दीर्घ वेलांटी जोडा. शब्द वाचा व लिहा.

कळ वाट कढ काठ

# १५. इटुकली मिटुकली











इटुकली मिटुकली.
खार माझी धिटुकली.
झाडावर चढली भरभर.
खाली उतरली झरझर.
हळूच जाता धरू,
लागली दूर पळू.



| जुई | दूध | चुका | बाभूळ |
|---|---|---|---|

'उ' आणि 'ऊ' असे उच्चार दर्शवण्यासाठी ऱ्हस्व उकार 'ु' व दीर्घ उकार 'ू' ही स्वरचिन्हे अक्षरांना जोडून वापरण्यास सांगावे व उच्चारांतील फरक सांगावा.

## स्वाध्याय

१. दिलेल्या शब्दांतील पहिल्या अक्षराला ऱ्हस्व 'उ'कार द्या. शब्द वाचा व लिहा —

कडी    मळा    सटका    दसरा

२. दिलेल्या शब्दांतील पहिल्या अक्षराला दीर्घ 'ऊ'कार द्या. शब्द वाचा व लिहा —

मठ    मग    खर    गळ

३. खालील शब्द वाचा. ऱ्हस्व 'उ'कार असलेल्या अक्षराखाली रेघ ओढा —

कुडी    सुरू    गुरुजी    चुळबूळ

४. दिलेल्या शब्दांतील दीर्घ 'ऊ'कार असलेल्या अक्षराखाली रेघ ओढा. शब्द वाचा. लिहा —

झुरळ    लाडू    गूळ    भुसा

जुडी    भुईमूग    बूट    खजूर

१६. | ए | ऐ | छ |



एडका ए



ऐरण ऐ



छत्री छ

ऐ छ ए

एक ऐट छावा एकता

छगन, छकडा चालव.
छाया, गाणी गा.
एकनाथ, गाणी ऐक.

## स्वाध्याय

१. दिलेल्या अर्धवर्तुळापासून 'ए' बनवा. जसे —

ए

२. खालील शब्दांतील 'ए' खाली रेघ ओढा आणि लिहा —

एकता        एवढा        एरंड

३. 'ए' पासून 'ऐ' बनवा. जसे —

ऐ

४. 'ऐ' भोवती वर्तुळ करा —

ऐ क        ऐ व ज        ऐ न क

५. अर्धवर्तुळापासून 'छ' बनवा. जसे —

छ

६. खालील शब्द वाचा आणि लिहा —

छत        छडी        छगन        छबी

## चाचणी २

(१) ' अ ' हे अक्षर काढा. त्याला योग्य ती स्वरचिन्हे जोडून आ, ओ, औ, अं ही अक्षरे कशी तयार केली ते क्रमाने लिहा.

(२) ∩ अशा (दक्षिणगामी) वर्तुळापासून तयार होणारे सर्व वर्ण लिहा.

(३) न, ल, ण, फ, ऐ, छ या अक्षरांतील योग्य अक्षर रिकाम्या जागी भरा.

. . . . पत, पा . . . . . न, पाषा . . . ., . . . . णी, . . . . कुली, . . . . गारा.

(४) रिकाम्या जागी योग्य शब्द भरा व ती वाक्ये पुन्हा वाचा.

१) बस घराजवळ आली . . . . . उतरा.

२) शाळा . . . . . घरी जा.

३) गाणी . . . . . . आणि गा.

४) बाहुली माझी . . . . किती!

(५) खालील शब्दांतून दोन वाक्ये तयार करा.

आला, लवकर, मामा, सकाळी, काल, उठा.

(६) ' मळ ' आणि ' कड ' ह्या शब्दांतील अक्षरांना स्वरचिन्हे लावून तीन-तीन अर्थपूर्ण शब्द तयार करा.

(७) खालील वाक्ये वाचा व पुन्हा त्याच क्रमाने सांगा.

एक खार आली.
झरझर झाडावर चढली.
कोणीतरी शिटी वाजवली.
खार घाबरली.
भरभर खाली उतरली.
दूर दूर पळाली.

(८) खाली दिलेल्या शब्दांतील चित्रांशी संबंधित शब्द रिकाम्या जागी भरा.

**बशी, वासरू, खडू, औषध.**

| चित्र | शब्द |
| --- | --- |
| १)  | ------- |
| २)  | ------- |

३)  - - - - - - -

४)  - - - - - - -

(९) कंसातील शब्दांचे योग्य रूप लिहून वाक्ये पूर्ण करा.

१) (फणस) भाजी करा.
२) ताई (हस) लागली.
३) तू (गाव) जा.

(१०) गिरकीचे गाणे हावभावांसहित समूहाने म्हणा.

(११) चित्रे काढा.

पाटी, फूल, माळ.

(१२) पाठ्यपुस्तकातील चित्रवाचन क्र. २ यातील चित्रे पाहून गोष्ट सांगा.

# १७. लेझीम



लेझीम | ले







केशव, लेझीम घे.
वेणू, लेझीम धर.
डफ वाजे डमडम.
लेझीम वाजे छमछम.
लेझीम चाले नादात.
पावले पडती तालात.



| खेळ | पेरू | टेकडी | शेतकरी |
|---|---|---|---|

'ए' असा उच्चार दर्शवण्यासाठी मात्रा 'े' हे स्वरचिन्ह अक्षरांना जोडून वापरण्यास सांगावे.

## स्वाध्याय

१. खालील शब्दांतील मात्रा असलेल्या अक्षराखाली रेघ ओढा —

पेढा मेथी रताळे सुभेदार

वाडेकर चुरमुरे

२. खालील शब्दांतील पहिल्या अक्षरावर एक मात्रा द्या. तो शब्द वाचा. लिहा —

वडा कळी मळा खडी

................................................................

................................................................

३. खालील शब्दांतील शेवटच्या अक्षरावर एक मात्रा द्या. तो शब्द वाचा. लिहा —

वार वड झाड भार

................................................................

................................................................

४. रेषा ओढून जोड्या लावा.

| | |
|---|---|
| केशव | डमडम |
| वेणू | छमछम |
| डफ वाजे | नादात |
| लेझीम वाजे | तालात |
| पावले पडती | लेझीम धर |
| लेझीम चाले | लेझीम घे |

# १८. बैल



बैल



हैदर, वेसण धर.
बैल आण.
भैरव, वैरण आण.
वैरण घाल.
शैला, पाणी आण.
पाणी पाज.





| पैसे | मैदान | वैशाख | बैठक |
|---|---|---|---|

'ऐ' असा उच्चार दर्शवण्यासाठी दोन मात्रा '  ै' हे स्वरचिन्ह अक्षरावर जोडून वापरण्यास सांगावे.

## स्वाध्याय

१. दिलेल्या शब्दांतील दोन मात्रा असलेल्या अक्षराखाली रेघ ओढा —

पैसे　　पैज　　मैदान　　कैलास

२. खालील शब्दांतील पहिल्या अक्षराला दोन मात्रा दया. शब्द वाचा आणि लिहा —

पसा　　बल　　वरण　　सल

........................................................................

........................................................................

३. गाळलेल्या जागी बै, पै, कै, शै यांपैकी योग्य अक्षर भरा. शब्द वाचा व लिहा —

.......री　　.......ला　　.......ठक　　.......ठण

........................................................................

........................................................................

४. दोन मात्रा असलेले चार शब्द लिहा —

........................................................................

........................................................................

५. पाठामधील वाक्ये लिहा व वाचा —

........................................................................

........................................................................

........................................................................

........................................................................

........................................................................

........................................................................

# १९. खोखो



## खोखो खो

खोखो खेळूया.
एक एक गडी पकडूया.
मोरू धावतो. गोपाळ खो देतो.
रोशन उठतो. धावू लागतो.
मोरू सापडतो. मोरू बाद होतो.
असा खेळ चालतो.

| टोपी | होडी | पोळा | दोन |
|---|---|---|---|

'ओ' असा उच्चार दर्शवण्यासाठी अक्षरापुढे काना आणि वर मात्रा ' ो ' काढण्यास सांगावे.

## स्वाध्याय

१. खालील शब्दांतील 'ओ'कार (काना व एक मात्रा) असलेल्या अक्षराखाली रेघ ओढा —

मोळी टोळ पागोटे झोपडी

२. शब्दांतील पहिल्या अक्षराला 'ओ'कार लावा आणि लिहा —

घ ट प ळी ब ल क ळी

..........

..........

३. रिकाम्या जागी कंसातील योग्य अक्षर लिहा —

(तो, को, पो, दो)

....ठी ....टी ....ट ....री

४. वाचा आणि लिहा —

गोळी कोकिळा पोलाद झोपाळा

..........

..........

५. तुम्हांला आवडणाऱ्या एका पक्ष्याचे चित्र काढा.

# २०. फौज



फौज 



चौघडा वाजला. फौज निघाली.
दौलत आला. गौतम आला.
गौरी आली. सौदामिनी आली.
फौज पाहिली.

| मौज | डौल | पौष | हौस |
|---|---|---|---|

'औ' असा उच्चार दर्शवण्यासाठी अक्षरापुढे काना आणि वर दोन मात्रा 'ौ' काढण्यास सांगावे.

## स्वाध्याय

१. 'औ'कार असलेल्या अक्षराभोवती वर्तुळ करा —

कौ मु दी  गौ त म  दौ ल त  शौ क त

२. पहिल्या अक्षराला 'औ'कार (काना व दोन मात्रा) लावा आणि लिहा —

ह स  म ज  म न  द ड

.....................................................................

.....................................................................

३. रेघा ओढून जोड्या लावा व तयार झालेला शब्द लिहा —

| (अ) | (आ) | |
|---|---|---|
| डाम | मौज | ..................... |
| गौरी | पाणी | ..................... |
| फौज | डौल | ..................... |
| हौस | गणपती | ..................... |
| औषध | फाटा | ..................... |

४. गाळलेल्या जागी दौ, नौ, हौ, चौ यांपैकी योग्य अक्षर भरा —

.....क  .....त  .....द  .....का

५. पाठातील वाक्ये वाचा व पाटीवर लिहा —

# २१. पतंग



पतंग तं

सहल निघाली बागेत.
मुले चालली रांगेत.
चंदू उडवी पतंग.
लालतांबडा सुंदर रंग.
लंगडी, खोखो सुरू जाहला.
लपंडाव मग खूप रंगला.
अंगतपंगत नंतर जमली.
सहल अशी ही खूप रंगली.



आंबा मुंगी चिंच उंदीर

'अं' असा उच्चार दर्शवण्यासाठी अनुस्वार 'ं' हे स्वरचिन्ह अक्षरावर देण्यास सांगावे.

## स्वाध्याय

१. खालील शब्दांतील अनुस्वार असलेल्या अक्षराखाली रेघ ओढा —

मोसंबी करवंद सफरचंद घंटा

२. पहिल्या अक्षरावर अनुस्वार द्या. शब्द वाचा व लिहा —

आबा खडू भाडे नदी

..........................................................................................

..........................................................................................

३. रिकाम्या जागी रं, नं, वं, मं यांपैकी योग्य अक्षर लिहा. शब्द वाचा व लिहा —

......जना ......गला शे......ती सदा......द

..........................................................................................

..........................................................................................

..........................................................................................

..........................................................................................

४. खालील वाक्ये वाचा आणि लिहा —

चंदू उडवी पतंग. ..........................................

लालतांबडा सुंदर रंग. ..........................................

अंगतपंगत नंतर जमली. ..........................................

सहल अशी ही खूप रंगली. ..........................................

# २२. अक्षरओळख

अ आ इ ई उ ऊ ऋ

ए ऐ ओ औ अं अः

क ख ग घ ङ

च छ ज झ ञ

ट ठ ड ढ ण

त थ द ध न

प फ ब भ म

य र ल व

श ष स ह ळ

क्ष ज्ञ

नमः | ः | मः वृक्ष | ृ | वृ

विसर्ग ' ः ' आणि ऋकार ' ृ ' या चिन्हांचा वापर करण्यास सांगावे.

## स्वाध्याय

१. गाळलेल्या जागी योग्य अक्षरे भरा —

| अ | आ | इ | ई | उ | ऊ | ए | ऐ | ओ | औ | अं | अः |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| — | ा | ि | ी | ु | ू | े | ै | ो | ौ | ं | ः |
| क | का | कि | की | कु | कू | के | कै | को | कौ | कं | कः |
| च | चा | | | | | | | | चौ | | |
| ट | | टि | | | | | | | | टं | |
| त | | | ती | | | | | | | | तः |
| प | | | | पु | | | | | | पं | |
| स | | | | सु | | | | | | सं | |
| ह | | | ही | | | | | | | | हः |
| क्ष | | क्षि | | | | | | | | क्षं | |
| ज्ञ | ज्ञा | | | | | | | | ज्ञौ | | |

वरील तक्ता पूर्ण केल्यानंतर क्रमाने उभा व आडवा वाचून घ्यावा.
याप्रमाणे इतर अक्षरांचा तक्ता विद्यार्थ्यांकडून करून घ्यावा.

२. वाचा आणि लिहा —

नमः शतशः दुःख अक्षरशः

तृषा वृक्ष गृह कृषी

## चाचणी ३

(१) खालील वाक्यांतील अधोरेखित अक्षरांना योग्य स्वरचिन्हे लावा.

१) मी पढ आणले.
२) आई पळ वाढते.
३) शेतात अत धरतात.
४) बल नांगर ओढतात.
५) चच आंबट लागते.

(२) खालील वाक्यांच्या शेवटी कंस दिलेले आहेत, त्यांत 'होय' किंवा 'नाही' लिहा.

१) लेझीम वाजे डमडम. ( )
२) डफ वाजे छमछम. ( )
३) गोपाळ खो देतो. ( )
४) मोरू बाद होतो. ( )
५) गाय भुंकते. ( )

(३) खाली दिलेले चुकीचे शब्द बरोबर लिहा.

णदी, पानी, षरबत, पैशे, फरसी.

(४) खालील वाक्ये वाचा व लिहा.

१) पक्षी उंच उडतात.

.................................................................................................

२) वृक्ष लावा आणि जगवा.

..............................................................

३) मूल रांगते.

..............................................................

४) घर कौलारू आहे.

..............................................................

५) आंबट कैरी तोडली.

..............................................................

६) ऋषी ज्ञानी होते.

..............................................................

(५) खालील शब्दांना काना किंवा मात्रा देऊन फळांची नावे लिहा.

केळी, परू, अंब, बर, अवळ.

(६) खालील शब्दांना इकार, ईकार किंवा उकार, ऊकार देऊन प्राणिमात्रांची नावे लिहा.

उंदर, संह, शेळ, घस, चमण, ससर, मंग.

(७) बाहुलीचे गाणे समूहाने हावभाव करून गा.

(८) बाहुली समोर आहे असे समजून तिची समजूत घालणारी चार वाक्ये लिहा.

(९) पाठ्यपुस्तकातील चित्रवाचन क्र. २ या चित्रातील प्राण्यांची नावे सांगा.

(१०) खालील चित्रात काय काय दिसते ते लिहा.



(११) १) जेवणातील कोणत्याही तीन पदार्थांची नावे सांगा.

२) शाळेत पाहिलेल्या कोणत्याही तीन वस्तू सांगा.

३) बागेत पाहिलेल्या तीन फुलांची नावे सांगा.

४) बाजारात पाहिलेल्या कोणत्याही तीन वस्तूंची नावे सांगा.

# २३. पाऊसपाणी





कमल, कुदळ आण.
अजय, जमीन खण.
रमेश, रोप आण.
सुमन, रोप लाव.
रोपाला आळे कर.



जया, पाणी आण.
रोपाला पाणी घाल.
भरपूर काम करू.
रोपे लावू. झाडे वाढवू.
पाऊसपाणी मिळवू.



## स्वाध्याय

१. कोणाला कोणते काम सांगितले आहे?

जसे — कमलला     कुदळ आण

१. रमेशला ..........

२. जयाला ..........

३. सुमनला ..........

४. अजयला ..........

२. चार फळझाडांची नावे लिहा —

१) .......... २) ..........

३) .......... ४) ..........

३. चार फुलझाडांची नावे लिहा —

१) .......... २) ..........

३) .......... ४) ..........

४. रेघा ओढून जोड्या लावा आणि पुन्हा लिहा —

| | | |
|---|---|---|
| १. पाऊसपाणी | आण | .......... |
| २. झाडे | खण | .......... |
| ३. कुदळ | वाढवू | .......... |
| ४. जमीन | मिळवू | .......... |

# २४. चूक कळली

एक होते तळे.
त्यात होते बेडूक.
बाजूला होते मैदान.
तेथे मुले खेळत.
खेळ म्हणून तळ्यात
दगड फेकत.
पाणी उंच उडे.
मुलांना गंमत वाटे.
पण दगड बेडकांना लागत.
असे रोज चाले.



बेडूक घाबरून गेले.
मग एक बेडूक पुढे आला.
मुलांना विचारू लागला,
''तुम्ही दगड का मारता?''
मुले म्हणाली,
''हा आमचा खेळ आहे.''
बेडूक म्हणाला,
''तुमचा खेळ होतो;
पण आमचा जीव जातो.''
मुलांना वाईट वाटले.
आपले चुकले, हे मुलांना कळले.
मुलांनी दगड फेकणे सोडून दिले.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| त् | त्‍ | + | या | = | त्या | त्यात |
| म् | म्‍ | + | ह | = | म्ह | म्हणून |
| ळ् | ळ् | + | या | = | ळ्या | तळ्यात |

## स्वाध्याय

- खालील शब्द वाचा आणि लिहा —

त्यात मोत्या तळ्यात म्हणाला

.............................................................................

.............................................................................

- पूर्ण वाक्यात पाटीवर उत्तरे लिहा —

१. मैदानावर कोण खेळत असत?

२. बेडूक कोठे राहत होते?

३. दगड कोणाला लागत?

४. मुलांनी कोणता खेळ सोडून दिला?

- पुढील वाक्य कोण म्हणाले?

१. "आमचा जीव जातो."

.............................................................................

.............................................................................

२. "हा आमचा खेळ आहे."

.............................................................................

.............................................................................

३. "तुम्ही दगड का मारता?"

.............................................................................

.............................................................................

# २५. बाग

आई : श्रीधर, आपण बागेत जाऊया.
छान छान फुले पाहूया.

श्रीधर : आई, हे फूल कशाचे?

आई : पिवळ्या शेवंतीचे.

श्रीधर : हे फूल बघ किती छान आहे.

आई : ते आहे लाल गुलाबाचे.

श्रीधर : पाने किती इवली इवली.

आई : हो ना आणि हिरवी हिरवी.

श्रीधर : ही ग फुले कशाची?

आई : जाई, जुई, चमेलीची.

श्रीधर : हे बघ या फुलांवर,
कोण ग उडते भरभर?



आई : ते आहे फुलपाखरू.
श्रीधर : आई, मी त्याला धरू?
आई : नको! ते फार नाजूक आहे.
श्रीधर : मग दुरून खेळू त्याच्याशी?
आई : हो. पण ते बघ उडाले.
श्रीधर : हवेवरती तरंगले.
आई : आहे ना गंमत बागेत?
श्रीधर : हो. आपण रोज येऊया इथे.

**श् + र = श्र श्रीधर**

## स्वाध्याय

- रेघा ओढून रंग आणि फुले यांच्या जोड्या लावा. पुन्हा लिहा-

| | | | |
|---|---|---|---|
| १. पांढरा | गुलाब. | पांढरा | ........ |
| २. पिवळी | मोगरा. | पिवळी | ........ |
| ३. केशरी | शेवंती. | केशरी | ........ |
| ४. लाल | गुलमोहर. | लाल | ........ |

● वाचा आणि लिहा—

श्रम श्रीधर श्रावण आश्रम

श्रवण विश्रांती वनश्री श्रीकांत

● पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा—

१. बागेत कोणकोणती फुले आहेत?

२. फुलांवरून कोण उडते आहे?

३. पानांचा रंग कोणता असतो?

● तुम्हांला आवडणाऱ्या एका फुलाचे चित्र काढा.

# २६. चिमणी

बाळ : चिमणीबाई, चिमणीबाई,
कुठे जाता घाई घाई?



चिमणी : पिलासाठी अंगणात,
दाणे सारे टिपून घेई.

बाळ : चिमणीबाई, चिमणीबाई,
कसे हो तुमचे घर?

चिमणी : काट्याकुट्या खाली
मऊ मऊ रुई वर.



बाळ : चिमणीबाई, चिमणीबाई,
तुमच्या घरी कोण कोण?

चिमणी : आमच्या घरी एक बाळ,
राजा राणी आम्ही दोन.



ट् + या घा = ट्या काट्याकुट्या

## स्वाध्याय

- खालील प्रश्नांची पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा —

१. चिमणी घाईघाईने कोठे जात आहे?

..........

..........

२. अंगणात चिमणी काय करते?

..........

..........

३. चिमणीच्या घरी कोण कोण आहेत?

..........

..........

..........

..........

- कंसातील योग्य शब्द निवडून जोड्या लावा.

जसे — चिमणी — चिमणा

१. लांडोर — ..........

२. कोकिळा — ..........

३. कावळी — ..........

४. कोंबडी — ..........

(कोकीळ, कोंबडा, मोर, कावळा)

# २७. परी



परी ग परी,
खेळायला ये ना माझ्या घरी.
आभाळातले तुझे घर,
कितीतरी आहे सुंदर.
वाऱ्याबरोबर तरंगतेस कशी?
अलगद खाली उतरतेस कशी?
मऊ मखमली तुझे अंग.
पंखावरती छान छान रंग.
फुलापानांवर उडताना,
हिरवळीत बागडताना,
तुझी माझी जमेल जोडी.
खेळाला किती येईल गोडी.
आईच्या कुशीत झोपेन जेव्हा,
स्वप्नात माझ्या येशील तेव्हा?

| | | |
|---|---|---|
| र् | ‍ॱ + य = ऱ्य | वाऱ्याबरोबर |
| स् | स + व = स्व | स्वप्न |
| प् | ए + न = प्न | स्वप्नात |
| व् | ० + ह = व्ह | तेव्हा |

## स्वाध्याय

- उत्तरे लिहा —

१. परीचे घर कोठे आहे?

..................................................

..................................................

२. परी कोणाबरोबर तरंगते?

..................................................

..................................................

३. मखमली अंग कोणाचे आहे?

..................................................

..................................................

४. परी कोठे बागडत आहे?

..................................................

..................................................

- रिकाम्या जागी पाठातील योग्य शब्द लिहा —

१. .................. ये ना माझ्या घरी.

२. मऊ .................. तुझे अंग.

- रंगांची पाच नावे लिहा —

१) .................. २) .................. ३) ..................

४) .................. ५) ..................

- पाटीवर फुलपाखराचे चित्र काढा.

# २८. फजिती

एक होते गाढव.
त्याच्या पाठीवर होते मिठाचे ओझे.
ते नदी ओलांडत होते.
त्याचा घसरला पाय.
ते पडले पाण्यात.
त्याला लवकर उठता येईना.
काही वेळाने ते उभे राहिले.
पण गंमत झाली.
त्याला ओझे हलके वाटले,
कारण मीठ पाण्यात
विरघळले होते.
त्याला आनंद झाला.
दुसऱ्या वेळेस काय झाले;



मालकाने नेहमीसारखे गाढवाच्या पाठीवर
ओझे लादले.
ते घेऊन गाढव नदी ओलांडू लागले.
त्याला मागचे आठवले;
पाण्यात पडले की ओझे हलके होते.
म्हणून गाढव मुद्दाम पाण्यात पडले
आणि उठू लागले.
पण काय झाले;
ओझे जास्तच जड वाटू लागले.
गाढवाच्या पाठीवर कापसाचे ओझे होते.
पाण्यात भिजून ते अधिक जड झाले होते.
गाढव कसेबसे उभे राहिले;
पण
जड ओझे घेऊन चालताना रडकुंडीला आले.

अशी गाढवाची खूप फजिती झाली.

द् + द = द्द मुद्दाम

## स्वाध्याय

- पूर्ण वाक्यात पाटीवर उत्तरे लिहा.

१. गाढवाच्या पाठीवर प्रथम कशाचे ओझे होते?

२. गाढव कोठे पडले?

३. पाण्यात काय विरघळले होते?

४. त्याला ओझे कसे वाटले?

- रिकाम्या जागी योग्य शब्द लिहा —

१. गाढवाचा .................... घसरला.

२. .................... पाण्यात विरघळले होते.

३. त्याला लवकर .................... येईना.

४. गाढवाची .................... झाली.

- चार पाळीव प्राण्यांची नावे लिहा —

१) .................... २) .................... ३) .................... ४) ....................

- वाचा आणि लिहा —

पऱ्या तऱ्हा दुसऱ्या

....................

....................

पट्टा शुद्ध लठ्ठ वृद्ध

....................

....................

# २९. वेडं कोकरू



वेडं कोकरू
खूप थकलं
येताना घरी
वाट चुकलं

अंधार बघून
भलतंच भ्यालं
दमून दमून
झोपेला आलं

शेवटी एकदा
घर दिसलं
वेडं कोकरू
गोड हसलं



डोकं ठेवून
गवताच्या उशीत
हळूच शिरलं
आईच्या कुशीत

## स्वाध्याय

- पूर्ण वाक्यात पाटीवर उत्तरे लिहा —

१. वाट कोण चुकले?

२. कोकरू काय पाहून भ्याले?

३. कोकरू हळूच कोठे शिरले?

- वाचा —

एक कोकरू रानात गेले. ते फिरून फिरून खूप थकले. घरी येताना वाट चुकले. ते अंधाराला भ्याले. कोकरू दमले. झोपेला आले. त्याला घर दिसले. ते गोड हसले. कोकरू आईच्या कुशीत शिरले.

- रिकाम्या जागी कवितेतील योग्य शब्द भरा —

१. वेडं कोकरू .................... थकलं.

२. दमून दमून .................... आलं.

३. शेवटी एकदा .................... दिसलं.

४. वेडं कोकरू .................... हसलं.

- प्राण्यांच्या पिलांची चित्रे जमवा.

# ३०. चाचा नेहरू



हे आपले चाचा नेहरू.
नेहरूंचा रंग गोरा, नाक सरळ.
सदा हसरे, दिसायला सुंदर.
त्यांना शिस्त आवडे.
लोकांची ते सेवा करत.
भारत स्वतंत्र झाला.
'चाचा नेहरू' पंतप्रधान झाले.
त्यांनी देशासाठी खूप काम केले.
धरणे बांधली, कारखाने काढले.
असे हे नेहरू नेहमी कोटावर
गुलाबाचे फूल लावत. त्यांना फुले
आवडत, मुले आवडत. मुलांना
चाचा नेहरू खूप आवडत.

त् + र = त्र स्वतंत्र
प् + र = प्र पंतप्रधान

**'नेहरूंचा'** या शब्दातील **'चा'** आणि **'चाचा'** या शब्दातील **'चा'** यांच्या उच्चारातील फरक सांगावा.

## स्वाध्याय

- पाटीवर उत्तरे लिहा —

१. नेहरूंनी देशासाठी काय केले?

२. नेहरू कोटावर काय लावत?

३. नेहरूंना कोणकोण आवडे?

४. भारताचे पहिले पंतप्रधान कोण झाले?

- खालील शब्द वाचा आणि लिहा —

शुभ्र प्रकाश ग्रहण शुक्रवार

..............................................................

..............................................................

रात्र मित्र पत्र स्वतंत्र

..............................................................

..............................................................

- नेहरूंचा या शब्दातील 'चा'सारखा उच्चार होणारे शब्द वाचा —

चुका चव चुरमुरे चोच

पाच काच चारा चमचा

- 'चाचा' या शब्दातील 'चा'सारखे उच्चार होणारे शब्द वाचा —

चहा वाचन विचार चंद्र

चक्र चिमणी चार चतुर

# ३१. वाढदिवस



ताईचा वाढदिवस. मजाच मजा.
मामा मामी आले. काका काकू आले.
मैत्रिणी आल्या. मित्र जमले.
शाळेतल्या बाई आल्या.
त्यांनी काय काय आणले?
पुस्तक, पेन आणि मोठमोठे फुगे.
ताईने मोठ्यांना नमस्कार केला.
त्यांनी तिला आशीर्वाद दिला.
छोटे नाचत म्हणाले, "ताईला सुखी राहू दे."

र् + वा = र्वा आशीर्वाद

'र्' या व्यंजनाला दुसरे अक्षर जोडताना या दुसऱ्या अक्षरावर ( र्‍ ) अशी खूण करतात, हे सांगावे.

## स्वाध्याय

- पूर्ण वाक्यात पाटीवर उत्तरे लिहा —

  १. वाढदिवसासाठी कोण कोण आले?

  २. वाढदिवसासाठी काय काय आणले?

  ३. ताईने कोणाला नमस्कार केला?

  ४. छोटे नाचत काय म्हणाले?

  ५. ताईला आशीर्वाद कोणी दिले?

- उत्तरे एका शब्दात लिहा — जसे — वडिलांच्या भावाला काय म्हणतात? — काका

  १. आईच्या भावाला काय म्हणतात? ..........

  २. वडिलांच्या बहिणीला काय म्हणतात? ..........

  ३. आईच्या बहिणीला काय म्हणतात? ..........

  ४. काकांच्या बायकोला काय म्हणतात? ..........

- वाचा आणि लिहा —

  सूर्य पूर्व सर्व वर्ग आशीर्वाद

  ..........

  ..........

- तुमचा जन्मदिवस कोणता हे आईला विचारून लक्षात ठेवा.



# ३२. झुक् झुक् गाडी

गाडी आली गाडी आली— झुक् झुक् झुक्
शिटी कशी वाजे बघा — कुक् कुक् कुक्
तिकिटाचे पैसे काढा — छन् छन् छन्
गाडीची ही घंटा वाजे — घण् घण् घण्
इंजिनाचा धूर निघे — भक् भक् भक्
चाके पाहू तपासून — ठक् ठक् ठक्
जायचे का दूर कोठे — भूर भूर भूर
कोठेही जा नेऊ तेथे — दूर दूर दूर
गाडीमधे बसा चला — पट् पट् पट्
सामानही ठेवा सारे — चट् चट् चट्
नका बघू डोकावून — शुक् शुक् शुक्
गाडी आता निघालीच — झुक् झुक् झुक्

## स्वाध्याय

- योग्य जोड्या जुळवा. लिहा —

१. गाडी    कुक् कुक् कुक्  ..........

२. शिटी    भक् भक् भक्  ..........

३. धूर    घण् घण् घण्  ..........

४. पैसे    झुक् झुक् झुक्  ..........

५. घंटा    छन् छन् छन्  ..........

- वाचा —

शिटी वाजली. गाडी आली. इंजिनाचा धूर निघाला. चाके तपासली. पैसे काढले.. तिकिटे घेतली. गाडीत सामान ठेवले. मुले गाडीत बसली. गाडीची घंटा झाली. गाडी निघाली.

- 'घण् घण् घण्', 'किण् किण् किण्' यांसारखे चार शब्द लिहा —

१) ..........  २) ..........

३) ..........  ४) ..........

- खालील शब्दांचा वापर करून योग्य जोड्या लावा.

रूळ    आकाश    रस्ता    नदी

१) विमान ..........  २) नाव ..........

३) सायकल ..........  ४) आगगाडी ..........

## चाचणी ४

(१) अ) खालील शब्दांतील ' च ' या अक्षराचे च आणि च्य असे वेगळे उच्चार होणारे शब्द दोन गटांत लिहा.

चव, चार, चरक, विचार, चाक, चिमणी, चहा, चाचा, चालणे.

आ) खालील शब्दांतील ' ज ' या अक्षराचे ज आणि ज्य असे वेगळे उच्चार होणारे शब्द दोन गटांत लिहा.

जड, जास्त, गजा, जहाज, जाळ, गंजी, जप.

(२) खालील पदार्थांचे रंग सांगा व लिहा.

हळद, ------ जांभूळ, --------

कुंकू, ------ फळा, --------

चुना, ------

(३) ' झुक् झुक् गाडी ' या पाठात खालील आवाज कशासाठी आले आहेत ते लिहा.

१) छन् छन् छन्
२) ठक् ठक् ठक्
३) घण् घण् घण्
४) कुक् कुक् कुक्

(४) 'ताईचा वाढदिवस' या विषयावर पाच वाक्ये सांगा.

(५) फुलपाखराचे चित्र काढा.

(६) कोण कोणास म्हणाले ते लिहा.

१) "तुम्ही दगड का मारता?"
२) "हा आमचा खेळ आहे."
३) "आई, हे फूल कशाचे?"
४) "ते आहे फुलपाखरू."
५) "ताईला सुखी राहू दे."

(७) 'आला माझ्या घरी' हे गाणे समूहाने हावभावयुक्त म्हणा.

(८) खालील वाक्ये वाचून दाखवा.

१) ताईने मोठ्यांना नमस्कार केला.
२) "त्यांनी काय काय आणले?"
३) पण काय झाले, ओझे जास्तच जड वाटू लागले.
४) मुले म्हणाली, "हा आमचा खेळ आहे."

(९) खालील शब्दांपासून दोन वाक्ये बनवा.

झाला, गाढव, मुद्दाम, स्वतंत्र, पडले, भारत, पाण्यात.

(१०) खालील अधोरेखित शब्दांना स्वरचिन्हे व अक्षरे लावून वाक्ये तयार करा.

१) रोप पाणी घाला.
२) गाढव खूप फजिती झाली.

३) शाळा बाई आल्या.
४) ताई मोठ्यांना नमस्कार केला.

(११) खालील वाक्ये वाचा.

अ) अशोक बागेत गेला. तेथे बसण्यासाठी बाक होता. बागेत फुलपाखरे होती. वेली होत्या. काही वृक्षही होते. फुलपाखरे इकडून तिकडे फिरत होती.

आ) प्रश्नांची उत्तरे लिहा.

१) अशोक कोठे गेला?

- - - - - - - - - - - - - - - - - -

२) तिथे त्याने काय पाहिले?

- - - - - - - - - - - - - - - - - -

३) फुलपाखरे काय करत होती?

- - - - - - - - - - - - - - - - - -

(१२) पुढील शब्दांसारखे प्रत्येकी दोन शब्द लिहा.

१) झुळझुळ १) - - - - २) - - - -
२) घणघण १) - - - - २) - - - -
३) गडगड. १) - - - - २) - - - -

(१३) बागेत रोपे लावायची आहेत. त्यासाठी कोणकोणती तयारी केली पाहिजे ते सांगा.

## गाणी

### १. ससा



ससा ससा दिसतो कसा
कापूस पिंजून ठेवलाय जसा
लाल लाल, डोळे छान
लहान शेपूट, मोठे कान
पाला खाऊन फुगतो टुम
चाहूल लागताच पळतो धूम.

### २. गिरकीचे गाणे

गरगर गिरकी घेऊया  फेर धरूनी नाचूया
आम्ही मुली साजऱ्या
नाही मुळी लाजऱ्या
गोल भिंगऱ्या होऊया  गरगर गिरकी घेऊया
गिरकी अमुची येता वेगा
झाडे होतिल हिरव्या रेघा
उंच आभाळी जाऊया  गरगर गिरकी घेऊया
गरगर गिरकी येईल रंगा
पंखच फुटतिल अवघ्या अंगा
आनंदाने न्हाऊया  गरगर गिरकी घेऊया

# ३. बाहुली

बोलत का नाही, झाले काय तुला बाई?
चोळी परकर नवीन केले,
दागदागिने सर्व घातले,
चूल बोळके जवळ मांडिले,
दिले सर्व काही, तरी तू बोलत का नाही?

आई तुजला रागे भरली?
की दादाने खोडी केली?
रुसली माझी बाळ सानुली,
काय करू बाई, गडे तू बोलत का नाही?

सांग तुला का भूक लागली?
देऊ का मी लाटुनी पोळी?
रुसू नको, घे ही बघ झाली
छकुले! ये खा ही! गडे तू बोलत का नाही?



# ४. आला माझ्या घरी



शेजीबाईचा कोंबडा
आला माझ्या दारी.
घालीन कोंडा
पाजीन पाणी.



शेजीबाईची बकरी
आली माझ्या दारी.
घालीन पाला
पाजीन पाणी.



शेजीबाईचा बैल
आला माझ्या दारी.
घालीन चारा
पाजीन पाणी.



शेजीबाईचा बाळ
आला माझ्या घरी.
देईन खाऊ
पाजीन पाणी.



# आपले राष्ट्रगीत

जनगणमन-अधिनायक जय हे
भारत-भाग्यविधाता ।
पंजाब सिन्धु गुजरात मराठा
द्राविड़ उत्कल बंग
विंध्य हिमाचल यमुना गंगा
उच्छल जलधि तरंग
तव शुभ नामे जागे, तव शुभ आशिस मागे
गाहे तव जय गाथा ।
जनगण मंगलदायक जय हे भारत-भाग्यविधाता ।
जय हे, जय हे, जय हे, जय जय जय जय हे ।।



मोहरी क्र.
1527

